**विविध शासकीय योजनेमध्ये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यात येणारा निधी तात्पुरत्या स्वरुपात राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेव खात्यामध्ये ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्र. लोलेस-२०१६/प्र.क्र.८७०/नवि-३१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०२ मार्च, २०१७

संदर्भ :-

**शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्रमांक- संकीर्ण-३४१६/प्र.क्र.४०/नवि-४, दिनांक २७ मे, २०१७**

प्रस्तावना :-

विधानमंडळाच्या लोकलेखा समितीने प्रधान सचिव (नवि-२) यांची साक्ष घेतली होती. सदर साक्षीच्या वेळी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना राज्य शासनाने दिलेला निधी कशाप्रकारे ठेवावा, याबाबत स्पष्टता नसल्यामुळे काही नागरी स्थानिक स्वराज्य संस्था हा निधी मुदत ठेवीमध्ये ठेवतात. तर काही नागरी स्थानिक स्वराज्य संस्था हा निधी चालू खात्यात ठेवतात. चालू खात्यात निधी ठेवल्यास त्यावर पुरेसे व्याज मिळत नाही. मात्र, यासंदर्भात राज्यशासनाकडून कुठल्याही स्थायी सूचना नसल्यामुळे स्थानिक स्वराज्य संस्थांकडून याबाबतची कार्यवाही करताना त्यामध्ये एकसमानता आढळून येत नाही. या परिस्थितीत यासंदर्भात राज्य शासनाने स्थायी सूचना देणे आवश्यक असल्याची बाब लोकलेखा समितीने अधोरेखित केली. त्यावेळी लोकलेखा समितीस दिलेल्या आश्वासनानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना याबाबत विनिर्दिष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक :-

केंद्र किंवा राज्य शासनाच्या योजनेमधून तसेच राज्य शासनाच्या विविध विकास विषयक कार्यक्रमांसाठी राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येणारा निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे प्राप्त झाल्यानंतर अशा निधीचे विहित पध्दतीने नियोजन करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) असा निधी स्थानिक स्वराज्य संस्थेकडे प्राप्त झाल्यानंतर त्याचा उचित विनियोग होण्यासाठी संबंधित प्रकल्प/योजना/काम तातडीने हाती घेऊन प्रशासकीय मंजुरीच्या/ निधी वितरणाच्या आदेशात नमूद कालमर्यादेत खर्च करण्यासाठी संपूर्ण नियोजन करण्यात यावे. असे नियोजन करुन असा निधी विवक्षित कामासाठी विहित कालमर्यादेत खर्च करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आयुक्त,महानगरपालिका व मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत यांची राहील.

ब) संबंधित प्रकल्पामध्ये खर्चासाठी अशा निधीची जोपर्यंत तात्काळ आवश्यकता नसेल अशा विशिष्ट कालावधीपर्यत सदर निधी त्यावर जास्तीत जास्त व्याजदर मिळेल अशातऱ्हेने राष्ट्रीयकृत बँकेमध्ये मुदत ठेवीच्या खात्यामध्ये गुंतवण्यात यावा.

क) अशाप्रकारे जास्तीत जास्त व्याजाची रक्कम मिळण्यासाठी असा निधी विशिष्ट कालावधीसाठी राष्ट्रीयकृत बँकेत गुंतवण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित महानगरपालिकेचे आयुक्त व संबंधित नगरपालिका/नगरपंचायतीचे मुख्याधिकारी यांची व्यक्तिशः जबाबदारी राहील व यामध्ये कसूर केल्यास ते शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र राहतील.

ड) वरील (क) प्रमाणे या निधीवर प्राप्त होणाऱ्या व्याजाचा विनियोग करण्यासंदर्भात या विभागाच्या संदर्भांकित दिनांक २७ मे, २०१६ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांवर बंधनकारक राहतील.

२. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०२१२०२५२५४२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.03.02 13:15:20 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.
११.आयुक्त, सर्व महानगरपालिका
१२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
१२. मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. निवडनस्ती, (नवि-३१/नवि-०४)